**महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळामार्फत हडपसर ते यवत (NH-६५) या रस्त्याची सुधारणा करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्र.योजना- २०२५/प्र.क्र.३५/नियो-१अ
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ०२ जून, २०२५

**संदर्भ:-** १.शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२४/प्र.क्र.८८ (भाग-३)/नियो-१अ, दि.१९.०९.२०२४

२. शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२४/प्र.क्र.८८ (भाग-१)/नियो-१अ, दि.०१.१०.२०२४

**प्रस्तावना:-**

हडपसर ते यवत हा पुणे ते सोलापूर राष्ट्रीय महामार्गाचा (NH-६५) भाग आहे. या लांबीमध्ये अनेक ठिकाणी वाहतुकीची समस्या असून वाहतुकीची कोंडी सुद्धा होते. तसेच सदरचा मार्ग पुणे व सोलापूर जिल्ह्यातील शेतीचा माल, औद्योगिक वस्तु आणि इतर व्यवसायांसाठी आवश्यक मार्ग आहे. सबब हडपसर ते यवत रा.मा.६५ कि.मी. ८/५०० ते ४०/००० मधील लांबीत कि.मी. ८/५०० ते ३३/५०० मध्ये सहा पदरी उन्नत मार्ग व अस्तित्वातील रस्त्याचे सहापदरी बांधकाम करणे व कि.मी. ३३/५०० ते ४०/००० मध्ये अस्तित्वातील रस्त्याचे सहापदरी बांधकाम करणे ही कामे महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ (MSIDC) यांचेकडून हाती घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक २९ एप्रिल, २०२५ रोजीच्या बैठकीत हडपसर ते यवत (NH-६५) या रस्त्याची सुधारणा करणेबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुषंगाने खालील बाबींना मान्यता प्रदान करण्यात येत आहे :-

१. हडपसर ते यवत रा.मा.६५ कि.मी. ८/५०० ते ४०/००० मधील लांबीत अ) कि.मी. ८/५०० ते ३३/५०० मध्ये सहा पदरी उन्नत मार्ग व अस्तित्वातील रस्त्याचे सहापदरी बांधकाम करणे व ब) कि.मी. ३३/५०० ते ४०/००० मध्ये अस्तित्वातील रस्त्याचे सहापदरी बांधकाम करणे असे एकूण रू.५२६२.३६ कोटीचे काम महामंडळामार्फत BOT तत्त्वावर विकसित करण्यास तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

२. हडपसर ते यवत या प्रकल्पाकरीता काम पूर्ण झाल्यानंतर MoRTH च्या सन २००८ च्या पथकर धोरणानुसार म्हणजेच सर्व प्रकारच्या वाहनांवर पथकर आकारण्यात येईल.

३. महाराष्ट्र शासन व NHAI यांच्यामध्ये सामंजस्य करार (MoU) करून ३० वर्षे अथवा आर्थिक सुसाध्यता अहवालानुसार येणारा कालावधी यापैकी कमी येणा-या सवलत कालावधीकरीता महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा महामंडळास उद्योजक म्हणून घोषित करण्यात येईल.

४. पथकर वसुलीकरीता १००% फास्ट टॅग/ जी.पी.एस. व इतर अद्यावत पथकर वसुली प्रणालीच्या आधारे उद्योजक/ महामंडळ यांनी शासनास Real time उपलब्ध करणे अनिवार्य करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्पाच्या BOT च्या करारनाम्यात Revenue sharing ची अट अनिवार्य राहील.

५ अ) हडपसर ते यवत या प्रकल्पाकरीता प्रस्तावित सवलत कालावधीत प्रकल्पाचे कार्यारंभ आदेशाच्या दिनांकानंतर प्रथमतः तीन महिन्यात तद्नंतर प्रत्येक ३ वर्षांने प्रकल्पावरील पथकर वसुली व अनुषंगिक बाबी याचे पुनर्विलोकन अपर मुख्य सचिव (सा.बां.), अपर मुख्य सचिव (वित्त) व अपर मुख्य सचिव (नियोजन) या त्रिसदस्य समितीमार्फत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. पूर्नविलोकनाअंती सदर प्रकल्पाचे महामंडळावरील वित्तीय दायित्व सपुंष्टात आल्याचे निदर्शनास आल्यास महामंडळामार्फत करण्यात येणारी पथकर वसूलीची रक्कम व पथकर वसूलीचे हक्क शासनाचे राहतील.

५ ब) संदर्भाधिन शासन निर्णय क्र.१ अन्वये मंजूर पुणे -शिरुर उन्नत मार्ग तसेच अहमदनगर ते देवगड रस्त्याची सुधारणा करणे व संदर्भाधिन शासन निर्णय क्र.२ अन्वये मंजूर शिरुर-छ.संभाजीनगर ग्रीनफील्ड तसेच पुणे-शिरुर at grade मार्गाची सुधारणा करणे या प्रकल्पाकरीता प्रस्तावित सवलत कालावधीत प्रकल्पाचे कार्यारंभ आदेशाच्या दिनांकानंतर प्रथमतः तीन महिन्यात तद्नंतर प्रत्येक ३ वर्षांने प्रकल्पावरील पथकर वसुली व अनुषंगिक बाबी याचे पुनर्विलोकन अपर मुख्य सचिव (सा.बां.), अपर मुख्य सचिव (वित्त) व अपर मुख्य सचिव (नियोजन) या त्रिसदस्य समितीमार्फत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. पूर्नविलोकनाअंती सदर प्रकल्पाचे महामंडळावरील वित्तीय दायित्व सपुंष्टात आल्याचे निदर्शनास आल्यास महामंडळामार्फत करण्यात येणारी पथकर वसूलीची रक्कम व पथकर वसूलीचे हक्क शासनाचे राहतील.

६. वरील नमूद मुद्दा क्र.५ नुसार पथकर वसूलीचे हक्क शासनास प्रत्यावर्तित झाल्यानंतर, पथकर वसूलीचे अधिकार शासनामार्फत नियुक्त यंत्रणेस देणेबाबत यथावकाश निर्णय घेण्यात येईल.

७. सदर प्रकल्पाच्या PPP तत्वावर आधारीत सवलत करारनामा/ करारनामा मसुदा/ निविदा प्रपत्र (Concession Agreement/Contract Agreement/Tender Documents) मध्ये महामंडळाने "actual traffic in excess of target traffic" या अटीनुसार सुनिश्चित target date ला सवलत कालावधीचे पुनर्विलोकित करण्याची अट समाविष्ट करून प्रकल्पाचा सवलत कालावधी सुधारण्यास तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

८. सदर प्रकल्पाकरीता आवश्यक भूसंपादन करणेकरीता MSIDC ला प्राधिकृत करण्यात येत आहे.

९. हडपसर ते यवत प्रकल्पाच्या BOT च्या करारनाम्यात upfront रकमेची तरतूद प्रस्तावित करण्यात आली असून प्राप्त होणा-या संभाव्य upfront रकमेतून at grade सहापदरी महामार्गाच्या आवश्यक भूसंपादन करणेकरीता निधी उभारण्यास तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

१०. सदर प्रकल्पावर शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय वाव बदल अनुज्ञेय नाही. शासनाच्या पूर्व मान्यतेने वाव बदलामुळे प्रकल्प किंमतीत होणारी वाढीव रक्कम संपूर्ण MSIDC चा सहभाग राहील.

११. सदर प्रकल्प कार्यान्वित करण्यास महामंडळास शासनाकडून अनुदान, शासन सहभाग, वित्तीय सहाय्य, कर्ज हमी ची आवश्यकता नाही या अटीवर सदर प्रकल्प महामंडळामार्फत कार्यान्वित करण्यास तत्वत: मान्यता देण्यात येत आहे.

१२. महामंडळामार्फत सदर प्रकल्प BOT तत्वावर हाती घेण्यास तत्वत: मान्यता देण्यात येत आहे. त्यानुषंगाने महामंडळाकडून सदर कामाकरीता प्रारुप निविदा/ करारनामा मसुदा (Draft Tender/Contract Documents) व Concession Agreement चा मसुदयास सक्षम प्राधिका-याची मान्यता (सा.बां.विभाग/ मा. मंत्रीमंडळ/ मा.मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा उपसमिती) घेणे अनिवार्य राहील.

१३. सदर प्रकल्पाच्या वस्तू व सेवाकराच्या रकमेमध्ये सवलत नाही.

१४. महसूल व वन विभागाच्या मार्गदर्शक सूचना व मानक प्रणालीस अधीन राहून गौण खनिजाच्या रकमेमध्ये सवलत देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१५. हडपसर ते यवत या लांबीमध्ये मेट्रोच्या कामाची आखणी व सुसाध्यता तपासून प्रस्तावित मेट्रोच्या कामामुळे प्रकल्पाचे वित्तीय नियोजनाच्या आराखड्यात बदल होत असल्यास मा.मंत्रीमंडळाची पूर्व मान्यता घेणे अनिवार्य राहील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४४/व्यय-११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०६०२१८२२३०१४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA SUBHASH WALKE

Digitally signed by PRADNYA SUBHASH WALKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=03547a345c47dd48007cd8b37a04c70078198a1a3a877ea19b46344a4c1470d4, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D7D0C662BC335A39B2B57F9BEA7376AD5B8FA997E2E98FD45A95D4AC6B4481FC, cn=PRADNYA SUBHASH WALKE
Date: 2025.06.02 18:41:00 +05'30'

(प्रज्ञा वाळके)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३.  मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास विभाग) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

४.  मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई

५.  मा. मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

६.  मा. राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम)  यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

७.  अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

८.  अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

९.  अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१०. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई

११. सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

१२. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पायाभूत सुविधा विकास महामंडळ

१४.सर्व सह सचिव/ उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

१५.सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग

१६. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ

१७.निवडनस्ती- कार्यासन (नियोजन-१अ)